पाटगाव मध्यम प्रकल्पांतर्गत करंबळी, ता.भुदरगड, जि.कोल्हापूर या को.प. बंधा-याच्या विस्तार व सुधारणा योजने अंतर्गत विशेष दुरुस्तीच्या कामास प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०१९/(प्र.क्र.१८८/२०१९)/सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक: ११/०५/२०२२

**वाचा:-**

१. कार्यकारी संचालक,महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे क्र.जा.क्र.मकृखोविम-३७/(६४५/२०१८)/सिंव्य ४/१८७४/२०२१ दि.०७/०४/२०२१ चे पत्र.
२. जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. प्रमा. २०१४/ (४६८/१४)/ सिंव्य (कामे), मंत्रालय, मुंबई दि. २०/०८/२०१४
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/(प्र.क्र.३०/२०१३)/विनियम भाग-२, दि.१७/०४/२०१५.
४. जलसंपदा विभाग, शासन निर्णय - २०१७/५६६/१७/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
५. जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३/सिंव्य(कामे), दि.०१/०८/२०१९
६. शासन परिपत्रक क्र. प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे) दि. १/१२२०१५

**प्रस्तावना:-**

कोल्हापूर जिल्ह्यातील भुदरगड तालुक्यातील वेदगंगा नदीवर पाटगांव मध्यम प्रकल्प पूर्ण झालेला आहे. प्रकल्पाची एकूण पाणी साठवण क्षमता १०५.२४२ द.ल.घ.मी. आहे. धरण हे द्वारविरहीत ओगी प्रकारच्या सांडव्याचे असून सांडव्यासह धरणाची एकूण लांबी ११०७.५० मी आहे. प्रकल्पांतर्गत एकूण १७ को.प. बंधारे बांधण्यात आले. सदर बंधा-याद्वारे उपसा जलसिंचन पध्दतीने पाटगांव प्रकल्पांतर्गत ८१०० हे. इतकी सिंचन क्षमता / १२०७० हे. पिकक्षेत्र निर्मिती झाली आहे. त्यापैकी करंबळी को.प. बंधारा सन १९८१ साली मंजूरी देऊन बांधणेत आला. पाटगांव प्रकल्प हा कोल्हापूर जिल्ह्यातील सर्वात जास्त पावसाच्या भागात येत असून धरण पाणलोट क्षेत्रात ४००० ते ६००० मि.मी. इतके वार्षिक पर्जन्यमान आहे.

या ठिकाणी पावसाची तिव्रता व नदीचा उतार जास्त असलेमुळे पावसाळ्यात प्रवाहाबरोबर झाडे वाहून येतात. त्यामुळे या को.प. बंधा-याची पडझड झाली होती. त्यामुळे बंधा-यामध्ये पाणीसाठा करता येत नव्हता व बंधा-याचे प्रकल्पीय ३१४ हे. क्षेत्र सिंचनाखाली आणणेचे उद्दीष्ट साध्य होत नव्हते. सदरचे उद्दिष्ट साध्य होणेसाठी लाभधारक शेतकरी व लोकप्रतिनिधी यांनी सदर को.प. बंधा-याची विशेष दुरुस्ती करणे बाबत आग्रही मागणी केली आहे. वरील सर्व बाबींचा विचार होऊन करंबळी ता.भुदरगड, जि.कोल्हापूर या को.प. बंधा-याच्या संधानकामध्ये पुनर्बांधणी करण्याच्या कामास विस्तार व सुधारणा अंतर्गत विशेष दुरुस्तीच्या कामास शासन निर्णय क्र. प्रमा. २०१४ / (४६८/१४) / सिंव्य (कामे), मंत्रालय, मुंबई दि. २०/०८/२०१४ नुसार रु. १९१.८१ लक्ष (दरसूची २०१३-१४) इतक्या किंमतीस प्रशासकीय मान्यता मिळाली आहे. सदर को.प. बंधाऱ्याच्या प्रशासकीय मान्यतेच्या वेळी सदर कामाबाबत कार्यकारी अभियंता, मध्यम प्रकल्प विभाग क्र. २, कोल्हापूर या बांधकाम विभागामार्फत पाठपुरावा सुरु होता. परंतु करंबळी को.प.बंधाऱ्यास विस्तार व सुधारणा अंतर्गत विशेष दुरुस्ती करण्यास प्रशासकी मान्यता मिळाली. परंतु विस्तार व सुधारणाचे लेखाशिर्ष (Head) हे बांधकाम विभागाकडे नसलने सदर काम कार्यकारी अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे विभाग (दक्षिण), कोल्हापूर यांचेमार्फत करण्याचे ठरले. यामध्ये बराच कालापव्यय झाला आहे. सन २०१४

मध्ये मंजूर प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रकात करंबळी को.प. बंधा-याचे सर्व प्रस्तंभ, स्लॅब व स्तंभ कोसळलेल्या ठिकाणी पायासाठी आवश्यक असणा-या कठीण स्तराच्या अभावामुळे सा.क्र. २.८२ ते २५.० मी. मध्ये राफ्ट फाउंडेशनची तरतूद इ. बाबींचा समावेश होता. सद्य:स्थितीत सन २०१५ व २०१६ चे पावसाळी हंगामामध्ये बंधा-याचे उर्वरीत दगडी स्तंभाचे दगड पाण्याचे प्रचंड वेगामुळे विस्कळीत झाल्यामुळे त्यावरील उर्वरित स्लॅब कोसळण्याच्या स्थितीत आल्यामळे पाया भूस्तराचे वर्गीकरणासाठी नव्याने विंधन विवरे घेण्यात आली. व त्यानुसार कठीणस्तर पाया पातळी निश्चित करण्यात आली. विंधन विवरांच्या निष्कर्षावर आधारीत पाया पातळी निश्चितीच्या अनुषंगाने मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक यांचेकडून प्राप्त सविस्तर संकल्पचित्रानुसार खोदकाम व संधानक बांधकामाच्या परिमाणात व त्या अनुषंगाने प्रकल्पाच्या किंमतीत वाढ झाली आहे. याअनुषंगाने करंबळी को.प.बंधाऱ्याच्या दुरूस्ती कामास विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार शासन पूढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय:-</u>**

महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे अंतर्गत पाटगाव मध्यम प्रकल्पांतर्गत रंबळी, ता.भुदरगड, जि.कोल्हापूर या को.प. बंधा-याच्या विस्तार व सुधारणा योजने अंतर्गत विशेष दुरुस्तीच्या रू. **७,४२,४८,४८५ /-** (रू.सात कोटी बेचाळीस लक्ष अठ्ठेचाळीस हजार चारशे पंच्यांशी रुपये फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) तांत्रिक मान्यता, निविदा प्रक्रिया, कामाचे नियोजन व पूर्णत्व, प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय / परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.
२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.
३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन,निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.
४) सदर दुरुस्ती काम पूर्ण झाल्यानंतर प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांतर्गत पाणी वापर संस्था स्थापित करुन लाभक्षेत्र हस्तांतरीत करणेची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रीय अधिका-याची राहील.
५) सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रिय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८० - सर्वसाधारण, १९०- सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती / विस्तास व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अंशदान (००) (१५) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (विस्तार व सुधारणा) (उर्वरित महाराष्ट्र) (४७०२ ७४५२) ५४, गुंतवणुका या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ.सं/३६/२०२२ दि. २५/०२/२०२२ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ.सं/१३९/२०२२ दि. ०८/०४/२०२२ नुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे. या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र.६ सन २०२२-२३ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५१११२०३३३१०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2022.05.11 12:05:37 +05'30'

**( वैजनाथ चिल्ले )**
**शासनाचे उप सचिव**

**सोबत :- सहपत्र**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
८) मा.मंत्री,जलसंपदायांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
९) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
११) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरी क्षा),महाराष्ट्रराज्य,मुंबई,
१२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरी क्षा),महाराष्ट्रराज्य,नागपूर,
१३) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ,जळगाव,
१४) मुख्य अभियंता जसं,जलसंपदा विभाग ,पूणे
१५) आंतर वित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१६) अधीक्षक अभियंता , कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर
१७) कार्यकारी अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे विभाग (दक्षिण),कोल्हापूर
१८) सिं.व्य.(कामे)कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०१९/ (प्र.क्र.१८८/२०१९)/ सिंव्य (कामे),

दि. ११/०५/२०२२ चे सहपत्र

| Sr.No. | Description of Item | Amount in Rs. |
|---|---|---|
| १ | works (excluding royalty) | ५,९८,२४,२६४ |
| २ | Royalty | ४८,५२,३३९ |
| ३ | १ % Insurance | ५,९८,२४३ |
| ४ | १२ % GST | ७१,७८,९१२ |
| ५ | ३ % CONTIGENCIES | १७,९४,७२८ |
| | Total Rs. | **७,४२,४८,४८५** |

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2022.05.11 12:05:52 +05'30'

( वैजनाथ चिल्ले )

शासनाचे उप सचिव